महसूल विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय स्तरावरील गट-ब (अराजत्रित), गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीपूर्व पाच वर्षांपर्यंतची असाधारण रजा मंजूरीचे प्रशासकीय विभागाच्या सचिवांचे अधिकार विभागीय आयुक्तांना पुन:प्रत्यायोजित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्रमांक : एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.८०१/ई-७**

मंत्रालय (मुख्य इमारत), १ ला मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०२ जानेवारी, २०२०

वाचा:- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.सेविने-१०८९/११०/सेवा-४, दि.१०.०४.१९९०.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अरजा-२४०५/प्र.क्र.५/०५/सेवा-८, दि.२३.०८.२००५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ६६ (२) खालील टिपेनुसार निवृत्तीपूर्व रजा म्हणून मंजूर केलेल्या रजेमध्ये असाधारण रजेचा समावेश होत नाही. शासकीय कर्मचाऱ्यास निवृत्तीच्या लगतपूर्वी असाधारण रजा अनुज्ञेय नसल्यामुळे कार्यालय प्रमुख ती मंजूर करु शकत नसल्याने अशा प्रकरणात शासकीय कर्मचाऱ्याला देण्यात आलेल्या असाधारण रजेस कार्यालय प्रमुखाने प्रथम शासनाची मंजूरी घेऊन ती असाधारण रजा मंजूर करुन घ्यावी व नंतरच अशा शासकीय कर्मचाऱ्याचे निवृत्तीवेतनाचे कागदपत्र तयार करुन महालेखापाल, मुंबई / नागपूर यांच्याकडे पाठवावेत, अशी तरतूद वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.सेनिवे-१०८९/ ११०/सेवा-४, दिनांक १०.०४.१९९० नुसार करण्यात आलेली होती. या तरतुदीच्या अनुषंगाने क्षेत्रिय कार्यालयातील बरीच प्रकरणे वित्त विभागाच्या मंजूरीसाठी येत होती. त्यामुळे वित्त विभागाने वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अरजा-२४०५/प्र.क्र.५/०५/सेवा-८, दिनांक २३.०८.२००५ अन्वये निवृत्तीपूर्व पाच वर्षांपर्यंतची असाधारण रजा मंजूर करण्याचे अधिकार खालील परिशिष्ट - १ नुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या सचिवांना प्रत्यायोजित केलेले आहेत.

**शासन आदेश :-**

महसूल विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय स्तरावरील गट "ब" (अराजपत्रित), गट-क व गट-ड कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीपूर्व पाच वर्षांपर्यंतची असाधारण रजा मंजूरीचे महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ६६ (२) खालील टिपेनुसार वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अरजा-२४०५/प्र.क्र.५/०५/सेवा-८, दिनांक २३.०८.२००५ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या सचिवांना प्रत्यायोजित करण्यात आलेले अधिकार राज्यातील संबंधित सर्व विभागीय आयुक्तांना पुन: प्रत्यायोजित करण्यात येत आहेत.

२. सर्व विभागीय आयुक्त यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ६६ (२) खालील टीप व शासन निर्णय क्र.अरजा-२४०५/प्र.क्र.५/०५/सेवा-८, दिनांक २३.०८.२००५ मधील सर्व तरतुदींची काटेकोरपणे तपासणी करुन त्यांच्या अधिपत्याखालील जिल्ह्यातील प्रकरणांबाबत कार्यवाही करावी.

३. सदर शासन आदेश, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७/१७/सेवा-६, दि.२२.०२.२०१७ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०४१५४७३१९४१९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2020.01.04 15:34:06 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी,
३) प्रधान लेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
४) प्रधान लेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) सर्व कोषागार अधिकारी,
८) वित्त विभाग, कार्यासन सेवा-६, मंत्रालय, मुंबई-३२,
९) कार्यासन अधिकारी, ई-१०, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१०) निवड नस्ती, कार्यासन, ई-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.